# अनमोल भेट

## इटालियन लोककथा



एक जुनी म्हण आहे “चांगल्या गोष्टी गठ्ठ्यागठ्ठ्याने येतात.” ज्या काळात मसाल्यांचा व्यापार होता, त्या काळात ही म्हण अगदी योग्य होती. दालचिनी, लवंग आणि जायफळ यांच्या शोधात युरोपचे व्यापारी दूरदूरच्या देशांत जात असत. कारण या गोष्टी त्यांच्या देशात उपलब्ध नव्हत्या. शिवाय फक्त श्रीमंत लोकच त्या खरेदी करू शकत.

*अँटोनिओ* नावाचा इटालियन व्यापारी मसाले खरेदी करण्यासाठी जिनोआ शहरातून जहाजाने निघतो. अपघातानेच त्याला कळते की त्याच्या स्वत:कडे एक असा मौल्यवान खजिना आहे, जो मसाल्याच्या बेटांवर दुर्मीळ आहे. तेथील राजा उंदरांच्या समस्येवर उपाय शोधत असतो. आगामी घटना सिद्ध करतात की एखादी वस्तू कुणा एकासाठी निरुपयोगी असली तरी, दुसऱ्यासाठी उपयुक्त असू शकते.



# अनमोल भेट

लेखिका: मार्था हॅमिल्टन,
मिच वाइस

चित्रे: जॉन कँझलर

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

# लेखकाचे मनोगत

मसाल्याच्या पदार्थांनी जगाच्या इतिहासात महत्त्वाची भूमिका वठवली आहे. दालचिनी, लवंग आणि जायफळसारखे मसाले आज सहजपणे उपलब्ध होतात. पण एके काळी ते इतके दुर्मीळ होते की ते विकत आणण्यासाठी युरोपीय व्यापारी दूर देशांचे दौरे करत असत. आफ्रिकेच्या दक्षिण टोकाला वळसा घालून ते भारतात आणि आज इंडोनेशियाचा भाग असलेल्या व मसाल्यांच्या पदार्थांची विपुलता असलेल्या बेटांवर जात असत.

काही मसाले एवढे महाग असत की फक्त धनिक लोक आणि राजपरिवारच त्यांचा वापर करू शकत. शेकडो वर्षे ज्या देशांचा मसाल्याच्या व्यापारावर दबदबा होता, ते देश सर्वात शक्तिशाली आणि समृद्ध ठरले. इटलीतील जिनोआ आणि व्हेनिस ही शहरे मसाल्यांच्या व्यापारात अग्रेसर असल्यामुळेच प्रभावी बनली. कोलंबस सागरी प्रवासाला निघाला तेव्हा तो भारत व इंडोनेशिया बेटांवर जाण्यासाठी एक कमी अंतराचा मार्ग शोधत होता. पण तो पोहोचला उत्तर अमेरिकेला. अशाप्रकारे, मसाल्याच्या पदार्थांनी जगाच्या इतिहासात नकळतपणे प्रमुख भूमिका वठवली.

जगातील अनेक देशांच्या लोककथांमध्ये अशा कहाण्या आहेत, ज्यामध्ये उंदरांनी उच्छाद मांडलेला आहे आणि तेथील लोकांना मांजर या प्राण्याची माहिती नाही. ही कहाणीसुद्धा इटलीची अशीच एक लोककथा आहे.



फार वर्षांपूर्वी इटलीच्या जिनोआ शहरात *अँटोनिओ* नावाचा व्यापारी राहात होता. एकदा अँटोनिओने आपले मालाने भरलेले जहाज दूर देशीच्या बेटांकडे नेले. तिथे तो मसाल्याचे पदार्थ विकत घेणार होता. त्याच्या मायदेशात त्याला खूप मागणी होती.



अँटोनिओ तिथे पोहोचला. तो एका बेटावरून दुसऱ्या बेटावर गेला. त्याने मखमल देऊन दालचिनी, बाहुली देऊन लवंग आणि कातडी पट्टे देऊन जायफळ घेतले.

एका बेटावर अँटोनिओला राजवाड्यात भोजनासाठी आमंत्रित करण्यात आले.
तो भोजनासाठी बसला तेव्हा तेथील पहारेकरी हातात काठ्या घेऊन कुणालातरी मारण्याच्या बेतात आहेत, असे दृश्य त्याला दिसले.

“विचित्रच आहे!”
त्याला आश्चर्य वाटले.
“हे पहारेकरी कुणाला मारतायत?” “



जेव्हा भोजन वाढण्यात आले तेव्हा
ॲंटोनिओला आपल्या प्रश्नाचे उत्तर मिळाले.
अन्नाचा सुवास सुटल्यावर अचानक तिथे
डझनावारी उंदीर दिसू लागले.
पहारेकरी उंदरांचा पाठलाग करत
धावू लागले आणि
आपल्या काठ्यांनी त्यांना
हाकलू लागले.

अँटोनिओ स्तंभित झाला. “महाराज,” तो म्हणाला, “या बेटावर मांजरं नाहीत का?”

राजा गोंधळला.

“मांजरं? कधी ऐकलं नाही त्यांच्याबद्दल. काय असतात ते?”

“मांजरं मऊ, केसाळ छोटे प्राणी असतात. त्यांना शिकार करायला आवडते,” अँटोनिओ उत्तरला.

“त्यांना उंदराचा पाठलाग करायला खूप आवडते. ते तुमच्या बेटावरच्या उंदरांचा नायनाट करू शकतात, अगदी सहजपणे!”

“खरं की काय?” राजाने विचारले.

“कुठे मिळतील ही माजरं? तू आम्हाला आणून दिलीस तर मागशील तेवढे पैसे देईन तुला. फक्त त्यांची किंमत सांग.”

“मला काहीही नकोय,” अँटोनिओने स्पष्ट केले. “आमच्या जहाजावर खूप मांजरं आहेत. त्यातलीच काही मी तुम्हाला देईन.”

अँटोनिओ तिथून जहाजावर गेला आणि काही वेळाने एक तपकिरी मादी आणि एक नर बोका घेऊन परतला. त्याने त्यांना खुले सोडून दिले तेव्हा उंदरं घाबरून भोजन कक्षातून पळून गेले आणि मांजरे त्यांचा पाठलाग करू लागली.



"काय अफलातून प्राणी आहे!" राजा आनंदाने ओरडला.

"आभार मित्रा. याच्याबदल्यात तुला काही द्यावसं वाटतंय."

राजाने अँटोनिओला मौल्यवान रत्ने आणि दागिने यांनी भरलेली एक पेटी दिली.

"याची काही गरज नाही," अँटोनिओ म्हणाला. पण राजाने त्याचे काहीएक ऐकले नाही. "अँटोनिओ, तू आम्हाला बहुमूल्य भेट दिली आहेस. आमचं बेट रत्नं आणि दागिन्यांनी समृद्ध आहे. त्यांचं काय करायचं ते आम्हाला कळत नाही.

कृपा करून, तू दिलेल्या उपयुक्त प्राण्याच्या बदल्यात आमच्याकडून या भेटीचा स्वीकार कर."





अँटोनिओ जिनोआला परतला आणि आपल्या प्रवासाची कहाणी त्याने सर्वांना सांगितली.

सर्वांना त्याच्या नशीबाचे नवल वाटले, फक्त *लुइगी*शिवाय! लुइगी हा शहरातील सर्वात श्रीमंत व्यापारी होता. अँटोनिओची बातमी ऐकून त्याचा मत्सर जागा झाला. “दोन निरुपयोगी मांजरांसाठी राजाने अँटोनिओला दुर्मीळ रत्ने आणि दागिने दिले! अशी भेट तर कुणी गरीब शेतकरीसुद्धा देऊ शकला असता राजाला,” लुइगी मनाशी म्हणाला. “मग मी राजाला एखादी मौल्यवान वस्तू भेट दिली तर तो बदल्यात मला किती मोठी भेटवस्तू देईल!”

लुइगीने आपल्या जहाजात उत्तम शिल्पे, उत्कृष्ट चित्रे आणि सुंदर कपडे लादली. तो राजाच्या बेटावर पोहोचला. त्याने राजाला निरोप सांगताना आपण अँटोनिओचे चांगले मित्र आहोत, असे खोटेच सांगितले. हे ऐकून राजाने लुइगीला भोजनासाठी आमंत्रित केले.

लुइगीने राजाला मौल्यवान भेटवस्तू दिल्या तेव्हा राजा चकीत झाला.

“तुमचं औदार्य पाहून मी प्रभावीत झालोय, लुइगी,” राजा म्हणाला. “कळत नाही, याच्याबदल्यात तुम्हाला काय देऊ!”



राजाने आपल्या मंत्र्यांशी सल्लामसलत केली. काही वेळाने लुइगीला राजदरबारात बोलावण्यात आले.

“तुम्हाला भेटवस्तू देण्यावर आम्ही विचारविनिमय केला, लुइगी. आम्ही तुमच्यासाठी एक खास भेटवस्तू निवडलीय. ती खरंच खूप मौल्यवान आहे,” असे म्हणून राजाने सेवकांना भेटवस्तू आणण्याचा आदेश दिला.

लुइगीच्या मनात आनंदाच्या उकळ्या फुटू लागल्या. अँटोनिओला मिळालेल्या दागिन्यांपेक्षा वीसपट जास्त दागिने आपल्याला मिळतील, अशी त्याची खात्री होती. भेटवस्तू मखमली कपड्याने झाकलेली होती. लुइगीने कपडा दूर केल्यावर त्याला धक्काच बसला. त्याला एक मऊ केसाळ चेंडू दिसला. चेंडू हलला, तेव्हा लुइगीच्या तोंडून शब्द बाहेर पडले....





....मांजरीचं पिल्लू!

“तुमचा मित्र अँटोनिओने आम्हाला जी अनमोल मांजरं दिली होती, त्यांना काही पिल्लं झाली. तुम्ही आम्हाला इतक्या मौल्यवान भेटवस्तू दिल्या. त्याबदल्यात आम्ही तुम्हाला आमच्याकडची ही सर्वात मौल्यवान वस्तू भेट देतोय.”



लुइगीने राजाच्या आनंदी चेहऱ्याकडे पाहिले. त्याला उमगले की त्याने राजाला दिलेल्या मौल्यवान भेटवस्तुंपेक्षाही हे मांजरीचे पिल्लू राजाला खूप जास्त मौल्यवान वाटते.

चेहरा हसरा ठेवून राजाने दिलेली भेट स्वीकारण्याचे नाटक करणेच योग्य ठरेल, हे लुइगीला कळून चुकले. आणि त्याने तेच केले.



लुइगी आणखी श्रीमंत होऊन घरी परतला नाही. पण तो आणखी शहाणा बनून परतला, हे निश्चित!



समाप्त